तिलारी जलविद्युत प्रकल्प, ता.चंदगड, जि. कोल्हापूर या प्रकल्पाच्या न्यायालयीन प्रकरणी ८६७४ शासनाने ठेवलेल्या प्रतिभूती ठेवी" या लेखाशिर्षाखाली मा.न्यायालयात भरणा करण्यासाठी निधी उपलब्ध करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

जलसंपदा विभाग,

शासननिर्णय क्र. लवाद-१२०८/(२१/२००८)सुधा-१/जवि.

मंत्रालय, मुंबई.

दिनांक :- १२.१२.२०११.

संदर्भ :- १) मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, कोकण विभाग यांचे पत्र क्र. मुअ/जसविकोप्र/तिजविप्र/आ-३(४)१९४८, दि. ३१/३/२००९.

२) अधिक्षक अभियंता, कोकण पाटबंधारे मंडळ, रत्नागिरी यांचे पत्र क्र. कोपामं-लेखा/का-९/तिजवि/६९३८, दि. १४/११/२०११.

**प्रस्तावनाः-**

तिल्लारी जलविद्युत प्रकल्प, ता.चंदगड, जिल्हा कोल्हापूर या प्रकल्पाचे कंत्राटदार मे.बी.टी.पाटील ॲण्ड सन्स बेळगाव विरुध्द महाराष्ट्र शासन, या न्यायालयीन प्रकरणी स्पेशल दरखास्त क्र. २६/२००७ मुंबई उच्च न्यायालय एस.एल.पी. २७/२००९ व सर्वोच्च न्यायालय सिव्हील अपिल क्र. ५६७६/२०१० दि.१५.७.२००८ रोजी मा.दिवाणी न्यायाधीश गडहिंग्लज यांची एक्झीक्युशन पिटीशन क्र. २६/२००७ वरील निर्णयानुसार डिक्री होल्डर यांना अदा करण्यासाठी रु ७,०५,७९,३१५/- इतकी रक्कम आदेशाच्या दिनांकापासून दोन महिन्याच्या आत न्यायालयात जमा करावी किंवा डिक्री होल्डर यांना अदा करावी तसेच सदर मुदतीत रक्कम न दिल्यास २ टक्के दराने दंडात्मक व्याज देण्याचे आदेश न्यायालयाने दिले आहेत. या संदर्भात मा.सर्वोच्च न्यायालय, नवि दिल्ली येथे दाखल केलेल्या सिव्हील ॲप्लीकेशन ५६७६/२०१० वर दिनांक ११.११.२०११ रोजी झालेल्या सुनावणीत रु. ७.०० कोटी इतकी रक्कम न्यायालयात चार आठवड्याच्या आत भरणा करण्याचे आदेशीत करण्यात आलेले आहे.

**शासन निर्णय** :-

उपरोल्लेखित न्यायालयीन प्रकरणी रु ७,०५,७९,३१५/- (अक्षरी रुपये- सात कोटी पाच लाख एकोणऐंशी हजार तिनशे पंधरा फक्त) इतकी रक्कम न्यायालयात जमा करण्यास या शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यात येत आहे.

याबाबत होणारा खर्च ८६७४-शासनाने ठेवलेल्या प्रतिभूती ठेवी-१०१- शासनाने ठेवलेल्या प्रतिभूती ठेवी (अ) न्यायालयाकडे जमा केलेल्या प्रतिभूती रकमा (संगणक संकेतांक ८६७४ ००१९) या लेखाशीर्षाखाली चालू वर्षाच्या अनुदानातून खर्ची टाकण्यात यावा.

वर उल्लेखिलेल्या लेखाशीर्षाखाली देण्यात आलेली मंजुरी ही अंतरिम आहे. जर वरिष्ठ न्यायालयात दाखल करण्यात आलेल्या अपिलांचा अंतिम निकाल शासनाच्या बाजूने लागला तर या आदेशान्वये मंजूर करण्यात आलेली रक्कम न्यायालयातून काढून त्या रकमेचा भरणा "८६७४-शासनाने ठेवलेल्या प्रतिभूती ठेवी-१०१-शासनाने ठेवलेल्या प्रतिभूती ठेवी (अ) न्यायालयाकडे जमा केलेल्या प्रतिभूती रकमा (संगणक संकेतांक ८६७४ ५०१२) या लेखाशीर्षाखाली करावा.

जर वरिष्ठ न्यायालयाचा निकाल शासनाच्या विरुध्द लागला तर सदरहू रक्कम " ८६७४-शासनाने ठेवलेल्या प्रतिभूती ठेवी-१०१-शासनाने ठेवलेल्या प्रतिभूती ठेवी न्यायालयाकडे जमा केलेल्या प्रतिभूती रकमा (संकणक संकेतांक ८६७४ ५०१२)" या लेखाशीर्षाखाली जमा दर्शवून जलसंपदा विभागाच्या २८०१ वीज, ८०० इतर खर्च (०१) परिरक्षण व दुरुस्ती-जलविद्युत प्रकल्प (०१)(०८) तिल्लारी जलविद्युत प्रकल्प, अधिक्षक अभियंता, कोकण पाटबंधारे मंडळ, रत्नागिरी (२८०१ २२१२) या लेखाशिर्षाखाली या अंतिम लेखाशिर्षाखाली टाकावा. यासाठी आवश्यक तो प्रस्ताव सादर करण्याची दक्षता नियंत्रक अधिका-यांनी घ्यावी.

हे आदेश वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र. ४०५/व्यय-१२, दि ५/१२/२०११ अन्वये प्राप्त झालेल्या मंजूरीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या (www.maharashtra.gov.in) या संकेत स्थळावर असून त्याचा सांकेतांक २०१११२१२०६१४३३००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(म.गो.गणवीर)
महाराष्ट्र शासनाचे अवर सचिव

प्रत,

१) मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, कोकण प्रदेश, मुंबई.
२) मुख्य अभियंता (विद्युत), जलविद्युत प्रकल्प, मुंबई.
३) महालेखापाल १/२ (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
४) महालेखापाल१/२ (लेखा परिक्षा) महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
५) आंतरवित्तीय सल्लागार व उपसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
६) वित्त विभाग, कार्यासन-व्यय-१२, अर्थसंकल्प-२/अर्थसंकल्प-९, मंत्रालय, मुंबई.
७) अधिक्षक अभियंता, कोकण पाटबंधारे मंडळ, रत्नागिरी.
८) कार्यकारी अभियंता, तिल्लारी शिर्षकामे विभाग क्र.१ कोनालकट्टा.